स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई या संस्थेस ३ टेस्ला एमआरआय सिस्टीम विथ टर्न की विथ ट्रान्सफार्मर खरेदी करण्यास प्रशाकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसएमए-२०२०/प्र.क्र.१९९/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ जून, २०२०.

**वाचा :-** १.शासन निर्णय क्रमांक एसएचए २०१९/ प्र.क्र. ५०/ प्रशा -१, दिनांक ०३.०७.२०१९
२.जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी बीड, कार्यालयाचे पत्र क्रमांक जिनसं / जिवायो/ पत्र /२०-२१ /५४५, दिनांक ११.०६.२०२०
३.संचालनालयाचे पत्र क्रमांक संवैशिवसं /स्वारातियग्राशावैमअं / ३ टे एमआरआय /प्र.मा / १ - म / २०२०, दिनांक १६.६.२०२०

**शासन निर्णय :**

उपरोक्त शासन निर्णय, दिनांक ०३.०७.२०१९ अन्वये विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय ग्रामीण वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई या संस्थेस संबंधित संस्थेस केंद्र शासनाच्या पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धनासाठी मंजूर अनुदानातून १.५ टेस्ला एमआरआय मशीन विथ टर्न की ही रुपये ९,५२,००,०००/- ( रुपये नऊ कोटी, बावन्न लक्ष फक्त ) इतक्या किमतीची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर संस्थेस जिल्हाधिकारी बीड कार्यालयाच्या उपरोक्त, दिनांक ११.०६.२०२० च्या पत्रान्वये तीन टेस्ला एमआरआय यंत्रसामुग्री खरेदी करण्यास आवश्यक असणारा अतिरीक्त निधी जिल्हा वार्षिक योजनेतंर्गत उपलब्ध होणार आहे. सबब स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई या संस्थेस उपरोक्त दिनांक ०३.०७.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या १.५ टेस्ला यंत्रसामुग्रीऐवजी संचालनालयाने उपरोक्त दिनांक १७.०६.२०२० च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्रसामुग्रीचे नाव | नग | किंमत |
|---|---|---|---|
| १ | ३ टेस्ला एमआरआय सिस्टीम विथ टर्न की विथ ट्रान्सफार्मर | ०१ | १७,३२,५१,००० |
| | एकूण | ०१ | १७,३२,५१,००० |

उपरोक्त यंत्रसामुग्री संस्थेस केंद्र शासनाच्या पदव्युत्तर अभ्यासक्रमाच्या श्रेणीवर्धनासाठी मंजूर अनुदानातून तसेच जिल्हा वार्षिक योजनेतंर्गत मंजूर होणाऱ्या निधीतून खर्च करण्यात यावा.

जिल्हा वार्षिक योजनेतून सदर यत्रसामुग्रीसाठी खालील लेखाशिर्षातून निधी उपलब्ध होणार आहे.

| मागणी क्र.ओ-५४ | | |
|---|---|---|
| ३४५१ | - | सचिवालय-आर्थिक सेवा |
| ०० | - | - |
| १०१ | - | नियोजन आयोग / नियोजन मंडळ |
| (५१) | - | जिल्हा योजना - बीड |
| (५१) (०४) | - | इतर जिल्हा योजना (कार्यक्रम) (३४५१२५३२) |
| ५२ | - | यंत्रसामग्री व साधन सामग्री |

सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी उपरोक्त दिनांक ०३.०७.२०२० च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्ती व निधीपरत्वे निधीचे लेखाशीर्ष कायम राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००६१९१३३३०४०२१३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने.

ARUN MURLIDHARRAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.06.19 15:28:18 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार -२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), नागपूर
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.मुंबई
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन ,मुंबई
४. जिल्हाधिकारी, बीड
५. अधिष्ठाता, स्वामी रामानंद तीर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अंबाजोगाई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
७. निवड नस्ती (प्रशा-१ )